**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शीर्षांतर्गत निधी वितरण. (लेखाशीर्ष २२०२ १९०१, २२०२ १९४८ व २२०२ एच ९७३-वेतन)**

**महाराष्ट्र शासन.**

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२०/ प्र.क्र. ०४ / का-६.

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक: ६ जुलै,२०२०.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, समक्रमांक, दि.२४.०४.२०२०, दि.८.०५.२०२० व दि.९.०६.२०२०.

३) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची नस्ती क्र.अनुवि-४९२०/प्र.क्र.३३/अर्थसंकल्प.

**शासन निर्णय-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १६ एप्रिल,२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ३ महिन्याकरिता (जून, २०२० अखेर) अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्यांच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली होती. यास अनुसरून वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिल्यानुसार आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत मागणी क्र.टी-५ मधील **२२०२- सर्वसाधारण शिक्षण** या मुख्य लेखाशिर्षांतर्गत खालील शालेय शिक्षण विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या योजनांतर्गत ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) या बाबीखालील वार्षिक अर्थसंकल्पीत तरतूदींच्या २५ टक्के मर्यादेतील तरतूदी शालेय शिक्षण विभागास वितरीत करण्यात आल्या आहेत.

सद्यस्थितीत वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) ०१-वेतन व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टांकरीता एकूण अर्थसंकल्पित तरतूदींच्या ३५ टक्क्यांच्या मर्यादेत निधी वितरणासाठी उपलब्ध करून देण्यात आला आहे. ही बाब विचारात घेऊन आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्रमांक टी-५ मधील **२२०२- सर्वसाधारण शिक्षण** या मुख्य लेखाशिर्षांतर्गत खालीलप्रमाणे नमूद योजनांकरिता उपलब्ध ३५ % मर्यादेतील तरतूदींपैकी उर्वरीत १० टक्के निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु. हजारात)

| अ. क्र. | योजनेचे नाव | अर्थसंकल्पित तरतूद | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली १० % तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान. (२२०२ १९०१)- ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) | ५०००८३.०० | ५०००८.३० |
| २ | अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान (२२०२ १९४८ ) - ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) | ४१५००.०० | ४१५०.०० |
| ३ | सैनिक शाळेमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य (२२०२ एच ९७३) - ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) | १५१७११.०० | १५१७१.१०० |
| | **एकुण** | **६९३२९४.००** | **६९३२९.४०** |

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डाऊनमुळे पुढील ३ ते ४ महिने राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरूपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा. सदर निधीचा वापर कोणतीही प्रलंबित थकबाकी (Arrears) अदा करण्यासाठी न करता नियमित वेतन अदायगीसाठीच करण्यात यावा.

३. विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी वितरीत तरतुदी त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना तात्काळ वितरित करावयात. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०६१७५५००१७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.07.07 10:50:28 +05'30'

**(रविंद्र दि.औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव.
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ अमरावती.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
१०. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.